जकात कर रद्द करणे, आणि त्याऐवजी पर्यायी महसूलाचे साधन शोधून काढणे, या प्रयोजनाकरिता नियुक्त केलेल्या समितीला अहवाल तयार करण्यास मुदत वाढ देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक: ओसीटी/१८९४/प्र.क्र. १२५/कराधान-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २४.११.१९९४.

वाचा:- १)शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१, दिनांक ७.६.१९९३.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक:संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१, दिनांक ४ सप्टेंबर १९९३.

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१०९१/प.क्र. ३४/कराधान-१, दिनांक २२ नोव्हेंबर १९९३.

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१, दिनांक ६ एप्रिल १९९४.

५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१, दिनांक २७ जुलै १९९४.

६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-ओसीटी-१८९४/प्र.क्र. १२५/कराधान-१, दिनांक १० ऑक्टोबर १९९४.

प्रस्तावना:-

प्रधान सचिव [वित्त] यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या जकात कर विषयक समितीच्या प्रारूप अहवालाच्या प्रती समितीचे सर्व सदस्य आणि संबंधित अधिकारी यांना पाठविण्यात आल्या असून, त्या प्रारूप अहवालावरील त्यांचे तपशिलवार अभिप्राय/सूचना शक्यतो लवकर कळविण्याची विनंती करण्यात आली होती. तथापि, सर्व सदस्यांकडून त्यांचे तपशिलवार अभिप्राय आणि सूचना अद्यापही प्राप्त झालेल्या नाहीत. समिती सदस्यांचे अभिप्राय आणि सूचना प्राप्त झाल्यानंतर त्या आधारे

समितीचा अंतिम अहवाल तयार करुन शासनाला सादर करण्यासाठी निश्चितच आणखी काही कालावधी लागणे अपरिहार्य झाले आहे. म्हणून सदर समितीला त्यांचा अंतिम अहवाल सादर करण्यासाठी आणखी मुदतवाढ मंजूर करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. तदनुसार शासन आता असा आदेश देत आहे की प्रधान सचिव [वित्त] यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त करण्यांत आलेल्या जकात कर विषयक समितीला त्यांचा अंतिम अहवाल सादर करण्यासाठी दिनांक ३१ मार्च १९९५ पर्यन्त मुदतवाढ मंजूर करण्यांत यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ वि. प्र. कुळकर्णी ]

शासनाचे अवर सचिव, वित्त विभाग.

प्रत माहितीसाठी सादर अग्रेषित. :

१] समितीचे सर्व सदस्य,
२] मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३] वित्तमंत्री/वित्त राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
४] सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५] सचिव, [परिवहन], गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६] सचिव [ग्राम विकास], ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७] विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, ८ वा मजला, माझगांव, मुंबई-४०० ०१०.
८] महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९] महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
१०] महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
११] निवड नस्ती, करधान-१.